जिल्हा नियोजन समिती, हिंगोलीसाठी
"कार्यकारी समिती" घटित करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक:डिएपी-२०१८/प्र.क्र. १५२ /का.१४८१-अ,**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२**
**दिनांक : २३ जानेवारी, २०१९**

**पहा**:- १) महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) अधिनियम ,१९९८
२) महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) (सुधारणा) अधिनियम, २०००
३) महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (सभा घेणे) (सुधारणा) नियम,२०१८
४) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, हिंगोली यांचे पत्र क्र. जिनिसहिं /जिवायो/१८-१९/१६८५ ,दि.२१/१२/२०१८

**शासन निर्णय :-**

" महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) अधिनियम, १९९८ च्या कलम १२ च्या तरतूदी अनुसार जिल्हा नियोजन समितीला सहाय्य करण्यासाठी, जिल्हा नियोजन समितीच्या अध्यक्षांच्या अध्यक्षतेखाली एक "कार्यकारी समिती" घटीत करण्याबाबतची तरतूद महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (सभा घेणे) (सुधारणा) नियम,२०१८ च्या "नियम ६-अ" मधे करण्यात आली आहे. त्यानुसार उपरोक्त नमूद कार्यकारी समितीमधे उक्त अधिनियमाच्या कलम ३(३) च्या परिच्छेद दोन अन्वये एकूण "नामनिर्देशित सदस्य"यांचेपैकी २ "नामनिर्देशित सदस्य" आणि कलम ३ (३) च्या परिच्छेद चार (अ) व (फ) नुसार एकूण " विशेष निमंत्रित " सदस्य यांचेपैकी २ "विशेष निमंत्रित" सदस्यांची नियुक्ती होणे आवश्यक आहे.

२. "महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (सभा घेणे) (सुधारणा) नियम,२०१८ " मधील "नियम ६-अ" च्या तरतुदीनुसार व महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) अधिनियम,१९९८ च्या कलम ३ (३) च्या परिच्छेद चार (अ) व (फ) नुसार एकूण " विशेष निमंत्रित " सदस्य यांचेपैकी ,जिल्हा नियोजन समिती , हिंगोलीचे अध्यक्ष तथा पालकमंत्री यांनी शिफारस केल्यानूसार हिंगोली जिल्हयातील खालील सन्माननीय संसद सदस्य व विधानसभा सदस्य यांच्या नामनिर्देशनासह जिल्हा नियोजन समिती हिंगोलीची "कार्यकारी समिती" खालीलप्रमाणे घटित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नांव | पदनाम |
|---|---|---|
| १. | मा. पालकमंत्री, हिंगोली | अध्यक्ष |
| २. | मा. श्री. राजीव सातव, संसद सदस्य | विशेष निमंत्रित सदस्य |
| ३. | मा.श्री. विप्लव बाजेरिया, विधानसभा सदस्य | विशेष निमंत्रित सदस्य |
| ४. | विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद | सदस्य |
| ५. | जिल्हाधिकारी, हिंगोली | सदस्य |
| ६. | मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प., हिंगोली | सदस्य |
| ७. | जिल्हा नियोजन अधिकारी, हिंगोली | संयोजक |

३. हिंगोली जिल्हा नियोजन समितीला सहाय्य करण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या कार्यकारी समितीमधे, महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) अधिनियम १९९८ च्या कलम ३(३) च्या परिच्छेद दोन अन्वये नियुक्त केलेल्या एकुण "नामनिर्देशित " सदस्यांपैकी दोन सदस्यांच्या नामनिर्देशित म्हणून नियुक्तीचे आदेश स्वतंत्रपणे काढण्यात येतील.

४. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, हिंगोली यांनी उपरोक्त आदेश सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावेत.

५. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९०१२४१२५३२१९७१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5494d2ad3a3bc5ddd66daf9a8f17ceec5e2d7d4b6a8bb a99c51d275801bcdf1b, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2019.01.24 13:03:06 +05'30'

**( वि.फ.वसावे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा. मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
४. मा. राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव
५. मा. पालक मंत्री तथा अध्यक्ष, जिल्हा नियोजन समिती, हिंगोली यांचे खाजगी सचिव
६. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
७. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
८. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, हिंगोली
९. उपआयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
१०.जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय ,हिंगोली
११.महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, हिंगोली
१३.निवडनस्ती,का-१४८१ अ.